महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांना नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५६००-३९१००+गेड पे रु.५४००) पदावर सरळसेवेने नियुक्ती देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.नियुक्ती-१११६/१९५७/प्र.क्र.३४३/२०१६/नवि-२७,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०३ एप्रिल, २०१७.

वाचा :- १. नगर विकास विभाग, शासन पत्र क्र.टिपीव्ही-१६१४/३७८/प्र.क्र.७६/नवि-२७, दि.१९.०१.२०१५.
२. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दि.२८.४.२०१५.
३. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दि.१६.०७.२०१५.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६.
५. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.११८३/१४०४/पंधरा, दि.२८.११.२०१६.
६. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/महाराष्ट्र लोकसेवा आयोग/नर-सरळसेवा/प्रशा-१/६८८५, दि.२२.१२.२०१६.

प्रस्तावना :-

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५६००-३९१००+ग्रेड पे रु.५४००) संवर्गातील सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांमधून नियुक्तीने भरण्याकरिता संदर्भाधिन दि.१९.०१.२०१५ रोजीच्या शासन पत्रान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणीपत्र पाठविण्यात आले होते. त्यास अनुसरुन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन दि.२८.११.२०१६ रोजीच्या पत्रान्वये नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) पदावर सरळसेवेने नियुक्ती देण्याकरिता १६ उमेदवारांची अंतिम निवडसूची तयार करुन शासनास शिफारस केलेली आहे.

०२. महाराष्ट्र शासकीय गट “अ” व गट “ब” (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५, दि.२८ एप्रिल, २०१५ व दि.१६ जुलै, २०१५ अन्वये महसूली विभाग वाटपाबाबत तरतुदी करण्यात आल्या आहेत. नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट “अ” व गट “ब” राजपत्रित अधिकाऱ्यांच्या बदल्या / पदस्थापना करण्याकरिता स्थापन करण्यात आलेल्या नागरी सेवा मंडळ क्र.१ यांनी दि.०८.०३.२०१७ रोजी याबाबत केलेल्या शिफारसी विचारात घेता, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेवारांना नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) पदावर सरळसेवेने नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत:-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांना नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील “नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)” (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५६००-३९१००+ग्रेड पे रु.५४००) या पदावर दोन वर्षाच्या परिविक्षाधिन कालावधीकरिता सरळसेवेने नियुक्ती देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | उमेदवाराचे नांव | वर्गवारी | शेरा |
|---|---|---|---|
| १ | श्री. दिपक दत्तात्रय वराडे | खुला | खुला महिला उमेदवारा ऐवजी-१ |
| २ | श्री. प्रणव बबनराव कर्पे | इमाव | इमाव-१ |
| ३ | श्री. विनय पंढरीनाथ झगडे | इमाव | इमाव-२ |
| ४ | श्री. संग्राम लहु कानडे | अनुसूचित जाती | खुला-२ |
| ५ | श्री. महेंद्र निळकंठ परदेशी | विमुक्त जाती (अ) | खुला-३ |
| ६ | श्रीमती कविताकौर प्रितमसिंघ कामठेकर | खुला (महिला) | खुला (महिला)-१ |
| ७ | श्री. अभिजीत भास्कर केतकर | खुला (अपंग) | खुला-४ |
| ८ | श्री. सचिन मुरलीधर पवार | खुला | खुला-५ |
| ९ | श्रीमती स्मिता आनंदराव कलकुटकी | विमुक्त जमाती (अ) (महिला) | विजा (अ) (महिला)-१ |
| १० | श्री. आशिष बबनराव मोरे | भटक्या जमाती (ब) | भज (ब)-१ |
| ११ | श्रीमती मुजाम्मिल मिरासो पठाण | इमाव (महिला) | इमाव (महिला)-१ |
| १२ | श्री. विक्रांत विजय गायकवाड | अनुसूचित जमाती | अज महिला उमेदवारा ऐवजी-१ |
| १३ | श्री. कल्पेश प्रल्हाद पाटील | इमाव | इमाव-३ |

०२. उपरोक्त नमूद नियुक्त्या खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहेत.

अ. सदर उमेदवारांची “नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित)” पदावरील नियुक्ती ही प्रथम दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी राहील. सदर परिविक्षा कालावधी त्यांनी समाधानकारकरित्या पूर्ण करणे आवश्यक राहील.

ब. सदर उमेदवारांच्या सेवाज्येष्ठता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या गुणवत्ता यादीतील अनुक्रमानुसार राहील.

क. सदर उमेदवारांची नियुक्ती तात्पुरती असून, सदर नियुक्ती त्यांचे पूर्वचारित्र्य व वर्तणूकीच्या पडताळणी अहवालावर अवलंबून राहील. जे उमेदवार यापूर्वीच शासन सेवेत आहेत त्या उमेदवारांचा शासन सेवेत वैद्यकीय तपासणी व पोलिस अहवाल त्या-त्या कार्यालयाने यापूर्वीच घेतला असल्यास, त्यांचे बाबतीत नव्याने तपासणी तसेच पोलिस अहवाल घेणे आवश्यक ठरणार नाही.

ख. मागासवर्गीय व इतर मागासवर्गीय उमेदवरांचे जात वैधता प्रमाणपत्र संचालक, समाजकल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून तपासून घेतले असल्यास, असे प्रमाणपत्र पुन्हा नव्याने तपासून घेणे आवश्यक ठरणार नाही.

ग. सदर उमेदवारांनी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९ मार्च, २००३ मधील तरतुदीनुसार संगणक हाताळणी / वापराबाबत आवश्यक प्रमाणपत्र सादर केले नसल्यास त्यांनी नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत संचालक, नगर रचना, पुणे यांचेकडे सादर करणे आवश्यक राहील अन्यथ त्यांच्या सेवा समाप्त होतील.

घ. ज्या उमेदवारांची खेळाडू प्रवर्गातील राखीव पदावर निवड करण्यात आलेली आहे, अशा उमेदवारांनी शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दि.३० एप्रिल, २००५, दि.२१ जून, २००६ व दि.१८ नोव्हेंबर, २००६ व क्र.संक्रीआ-१००६/(प्र.क्र.१८२/०६)/क्रीयुसे-२, दि.०६ मे, २००८ व क्र.क्रीस्पर्धा-२०१८ (प्र.क्र.५३८/०८)/क्रीयुसे-२, दि.१४ जुलै, २००९ मधील तरतुदींनुसार क्रीडा व युवक सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांच्याकडून खेळाविषयक अर्हता प्रमाणपत्र नगर रचना संचालनालयाकडे सादर करणे आवश्यक आहे.

ङ. ज्या उमेदवारांची अपंगासाठीच्या राखीव पदावर निवड करण्यात आलेली आहे, अशा उमेदवारांनी सामाजिक न्याय व विशेष साहाय्य विभाग, शासन परिपत्रक,क्र.अपंग-२००९/प्र.क्र.१३३/सुधार-३, दि.१४.०१.२०११ नुसार त्यांनी अपंगत्वाबाबतचे प्रमाणपत्र नगर रचना संचालनालयाकडे सादर करणे आवश्यक आहे.

च. ज्या उमेदवारांनी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.वशिअ-१२१४/प्र.क्र.२६/११, दि.०२ जून, २०१४ मधील तरतुदीनुसार, त्यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून दोन महिन्यांच्या कालावधीत त्यांची स्वत:ची मत्ता व दायित्वे याबद्दलची विवरणे विहित प्रपत्रामध्ये नगर रचना संचालनालयाकडे सादर करावीत. तसेच त्यानंतर प्रत्येक वर्षी त्या-त्या वर्षीच्या ३१ मार्चच्या स्थितीस अनुसरुन अशी मत्ता व दायित्वे यांचे विवरणपत्र त्या वर्षाच्या ३१ मे पर्यन्त संचालनालयाकडे सादर करावीत.

छ. या आदेशान्वये नियुक्ती देण्यात येत असलेल्या उमेदवारांपैकी ज्यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, क्र.एसआरव्ही-२०००/प्र.क्र.१७/२०००/१२, दि.०१.०७.२००५ नुसार दि.२८.०३.२००६ व तद्नंतर दोनपेक्षा अधिक मुले असल्याचे निदर्शनास आल्यास, असे उमेदवार शासकीय नोकरीस अपात्र ठरतील व त्यांची सेवा आपोआप संपुष्टात येईल.

ज. या आदेशान्वये नियुक्ती देण्यात येत असलेले उमेदवार हे शालान्त प्रमाणपत्र परीक्षेमध्ये हिंदी / मराठी भाषा विषय घेऊन उत्तीर्ण झाले नसल्यास त्यांना एतदर्थ मंडळाच्या हिंदी / मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

झ. या आदेशान्वये नियुक्ती देण्यात येत असलेल्या उमेदवारांना संचालनालयाच्या आस्थापनेवरुन शासकीय सेवेतून सेवामुक्त व्हावयाचे असल्यास त्यांनी किमान एक महिन्याची पूर्वसूचना देणे आवश्यक आहे. मात्र त्यांच्या सेवेचा राजीनामा सक्षम

अधिकाऱ्यांनी स्वीकारला तरच त्यांना कार्यमुक्त होता येईल. तसेच पूर्वसूचनेचा कालावधी संपण्यापूर्वी राजीनामा स्वीकारुन कार्यमुक्त व्हावयाचे असल्यास त्यांना नियमानुसार एक महिन्याचे मूळ वेतन ( पे बँड मधील वेतन+ग्रेड वेतन) याप्रमाणे येणारी रक्कम शासनाकडे रोख भरावी लागेल. मात्र सेवेचा राजीनामा स्वीकारण्याचे अथवा न स्वीकारण्याचे अधिकार सक्षम अधिकाऱ्यांना राहतील. तसेच राजीनाम्याबाबतच्या पूर्वसूचनेच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा व इतर सवलती त्यांना मिळणार नाहीत.

ञ. या आदेशान्वये नियुक्ती देण्यात येत असलेल्या उमेदवारांनी आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होणे आवश्यक आहे. उक्त कालावधीनंतर नियुक्ती स्वीकारण्याची उमेदवारांची कोणतीही विनंती विचारात घेण्यात येणार नाही.

**०३.** महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांना खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार पदस्थापना देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | महसूली विभाग वाटप | पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. दिपक दत्तात्रय वराडे | नागपूर | सहायक संचालक, नगर रचना, गोंदिया शाखा, गोंदिया. |
| २ | श्री. प्रणव बबनराव कर्पे | अमरावती | नगर रचनाकार, अकोला महानगरपालिका, अकोला. (शासकीय आस्थापना) |
| ३ | श्री. विनय पंढरीनाथ झगडे | औरंगाबाद | सहायक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, औरंगाबाद. |
| ४ | श्री. संग्राम लहु कानडे | नाशिक | नगर रचनाकार, धुळे शाखा, धुळे. |
| ५ | श्री. महेंद्र निळकंठ परदेशी | नागपूर | नगर रचनाकार, मुल्यांकन तज्ञ, चंद्रपूर/ गडचिरोली/ भंडारा. |
| ६ | श्रीमती कविताकौर प्रितमसिंघ कामठेकर | अमरावती | उप संचालक, नगर रचना, विकास योजना विशेष घटक, अमरावती महानगरपालिका, अमरावती. |
| ७ | श्री. अभिजीत भास्कर केतकर | पुणे | सह संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे. (नियम ७ (II) नुसार अपंग उमेदवार असल्याने, महसूली विभाग वाटपातून वगळण्यात आले.) |
| ८ | श्री. सचिन मुरलीधर पवार | औरंगाबाद | सहायक संचालक, नगर रचना, परभणी शाखा, परभणी. |
| ९ | श्रीमती स्मिता आनंदराव कलकुटकी | नाशिक | नगर रचनाकार, भुसावळ नगरपरिषद, भुसावळ, जि. जळगांव. (शासकीय आस्थापना) |
| १० | श्री. आशिष बबनराव मोरे | अमरावती | सहायक संचालक, नगर रचना, वाशिम शाखा, वाशिम. |
| ११ | श्रीमती मुजाम्मिल मिरासो पठाण | औरंगाबाद | सहायक संचालक, नगर रचना, हिंगोली शाखा, हिंगोली. |
| १२ | श्री. विक्रांत विजय गायकवाड | अमरावती | सहायक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, अमरावती. |
| १३ | श्री. कल्पेश प्रल्हाद पाटील | औरंगाबाद | सहायक संचालक, नगर रचना, नांदेड शाखा, नांदेड. |

०४. या आदेशान्वये नियुक्ती देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांची नियुक्त्या ह्या तात्पुरत्या व मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या याचिका क्र.२७९७/२०१५ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री. विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

०५. या आदेशान्वये नियुक्ती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांना नियुक्तीच्या ठिकाणी ज्या दिनांकास हजर होण्यास कळविण्यात आले आहे व ते नियुक्तीच्या ठिकाणी ज्या दिनांकास हजर होतील, याबाबत शासनास तातडीने अवगत करण्यात यावे.

०६. या आदेशान्वये नियुक्ती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास किंवा राजकीय दबाव आणून नियुक्ती अन्य ठिकाणी करण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्यानुसार नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाची कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चा भंग करणारी असल्याने संबंधित अधिकाऱ्याविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, यांची नोंद घेण्यात यावी.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०१७०४०३१३५७३८३६२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकिंत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.04.13 13:22:07 +05'30'

**(ए. कि. सहाणे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति :-**

**सर्व संबंधित अधिकारी, -------------------------------------------------- ------------**

**यांना संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत.**

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१.मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(३-प्रती)**
५. सर्व सह संचालक, नगर रचना, -------------------.
६. उप संचालक, नगर रचना, विकास योजना विशेष घटक, अमरावती महानगरपालिका, अमरावती.
७. आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला.

८. सहायक संचालक, नगर रचना, गोंदिया शाखा / वाशिम शाखा / परभणी शाखा / हिंगोली शाखा व नांदेड शाखा.
९. सहायक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, औरंगाबाद / अमरावती.
१०. नगर रचनाकार, धुळे शाखा, धुळे.
११. नगर रचनाकार, मूल्यांकन तज्ञ (चंद्रपूर / गडचिरोली / भंडारा), चंद्रपूर.
१२. मुख्याधिकारी, भूसावळ नगरपरिषद, भुसावळ, जि. जळगांव.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर.
१५. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, --------------------------------------
१६. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती.२७-नवि /

*****